पुराभिलेख संचालनालयामार्फत राजर्षी छत्रपती शाहू महाराज यांच्या जीवनावर आधारीत दुर्मिळ छायाचित्रे व कागदपत्रांचे प्रदर्शन आयोजित करण्यास प्रशासकीय मंजुरी देण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
शासन निर्णय क्रमांक- मपुवि-२०१४/प्र.क्र.१८१/सां.का.२
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २२ जून,२०१५.

वाचा :- १) शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.मपुवि २०१४/ प्र.क्र.१८१ / सां.का. २, दि. २१.०१.२०१५.
२) संचालक ,पुराभिलेख संचालनालय यांचे पत्र क्र. प्रकाशन २०१५/१६५९ दि. २२.०४.२०१५.

शासन निर्णय :-

शासनाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये कोल्हापूर येथे दि. २८ ते ३१ जानेवारी २०१५ या कालावधीत राजर्षी छत्रपती शाहू महाराज यांच्या जीवनावर आधारित दुर्मिळ छायाचित्रे व कागदपत्रांचे प्रदर्शन आयोजित करण्यास व त्यासाठी रु. २,००,०००/- ( अक्षरी रुपये दोन लाख फक्त) इतक्या खर्चास मान्यता दिली होती. मात्र काही अपरिहार्य कारणास्तव सदर कालावधीत प्रदर्शन आयोजित करणे शक्य झाले नाही.त्यामुळे सदर शासन निर्णयान्वये देण्यात आलेली मान्यता आता रद्द करण्यात येत आहे.

२. पुराभिलेख संचालनालयाने राजर्षी छत्रपती शाहू महाराज यांच्या जीवनावर आधारित दुर्मिळ छायाचित्रे व कागदपत्रांचे प्रदर्शन दि. २६ जून २०१५ ते ३० जून २०१५ या कालावधीत कोल्हापूर येथे आयोजित करण्यास मान्यता देण्याबाबतचा सुधारीत प्रस्ताव संदर्भ क्र. २ येथील दि. २२.०४.२०१५ च्या पत्रान्वये सादर केला होता. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता .

३. आता राजर्षी छत्रपती शाहू महाराज यांच्या जीवनावर आधारित दुर्मिळ छायाचित्रे व कागदपत्रांचे प्रदर्शन कोल्हापूर येथे दि. २६.०६.२०१५ ते दि. ३०.०६.२०१५ या कालावधीत आयोजित करण्यास व त्यासाठी रु. २,००,०००/- ( अक्षरी रुपये दोन लाख फक्त) एवढया खर्चास मान्यता देण्यात येत आहे. या बाबत बाबनिहाय खर्च करण्याचे व त्यामध्ये आवश्यकतेनुसार फेरबदल करण्याचे अधिकार संचालक, पुराभिलेख संचालनालय यांना राहतील. या प्रदर्शनाच्या खर्चाबाबतचे तपशिलवार उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, पुराभिलेख संचालनालय यांनी प्रदर्शनानंतर शासनास सादर करावे.

४. याबाबतचा खर्च मागणी क्र.झेडडी- २, २२०५ कला व संस्कृती, (००) १०४ पुराभिलेख (०१) (०२) पुराभिलेख कार्यालये (२२०५ १७९५) १३ कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका -१९७८ मधील भाग- पहिला, उप विभाग-३ मधील अनुक्रमांक-४ नियम क्र. २७ (२) मध्ये नमूद अटींच्या अधिनतेने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारातंर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१५०६२२१५३८०५१५२३ असा आहे. हा शासन निर्णय डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Basawaraj G Saidanawaru

Digitally signed by Basawaraj G Saidanawaru
DN: CN = Basawaraj G Saidanawaru, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Tourism & Cultural Affairs
Date: 2015.06.22 15:42:19 +05'30'

**( ब.गु. सैदानवरु)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई.
४) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७) कार्यासन अधिकरी (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई.
८) निवड नस्ती, सां.का.२.